**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्षातील ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील मंजूर अस्थायी पदांना दि.१.३.२०१० ते ३०.६.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र.मबाआ-२०१०/ प्र.क्र.६८/ का-७
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- ०५ मे, २०१०.

**वाचा** :-१) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५ एप्रिल, २००३.
२) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००३/प्र.क्र.४३८/का-६,दि.१४ जानेवारी, २००४.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४.१०.२००४
४) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६,दि. ३१ मार्च, २००६.
५) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि. १६.१०.२००७.
६) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००९/प्र.क्र.८०/का-७, दि. २६ मार्च, २००९.
७) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००९/प्र.क्र.८२/का-७, दि. २६ मार्च, २००९.
८) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००९/प्र.क्र.८३/का-७, दि. २६ मार्च, २००९.
९) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००८/ प्र.क्र. २३०/का-६, दि. १६ जुलै २००९.
१०) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००९/प्र.क्र.१८०/का-७, दि. १८ जुलै, २००९.
११) केंद्र शासनाचे पत्र क्र.एफ-१४-९/२००५-सीडी-१, दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० चे पत्र.
१२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांचे पत्र क्र.एबाविसे/प्रशासन/का-१/८७८/२०१०, दि.३३.२०१० व २३.३.२०१०.

**निर्णय :-** महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंध शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि.५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे तसेच संदर्भाधीन महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि.३१ मार्च, २००६, महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि. १६ ऑक्टोबर, २००७ अन्वये नव्याने निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे विचारात घेवून केंद्र शासनाच्या दि.८.५.२००९ च्या पत्राने २३ जिल्हा कक्षातील व शासन निर्णय महिला बाल विकास विभाग दि. १४.१.२००४ अन्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत २९७ ग्रामीण / आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील ५७९१२ अगंणवाडी सेविका व ५७९१२ अंगणवाडी मदतनीस तसेच ६१५५ मिनी अंगणवाडी सेविका या मंजूर मानधनावरील अस्थायी पदांना वरील संदर्भाधीन क्र.१० च्या शासन निर्णयान्वये दि.२८.२.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. तसेच त्याच धर्तीवर शासन निर्णय क्र.मबाआ-२००९/प्र.क्र.१८१/का-६, दि. २९.७.२००९ अन्वये ६३ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना व १० जिल्हा कक्षातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना दि.२८.२.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. उक्त प्रकरणी आता ३३ जिल्हा कक्षातील व एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना दि.१.३.२०१० ते ३०.६.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग दि.१४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने तसेच केंद्र शासनाने दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० अन्वये जिल्हा कक्षासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या मर्यादेत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई यांनी दि.२३.३.२०१० अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाचा सागोपांग विचार करुन **केंद्र शासनाने दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० अन्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या मर्यादेत सुधारित आढाव्याच्या अधीन राहून ३३ जिल्हा कक्षासाठी नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना दि.१.३.२०१० ते ३०.६.२०१० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.१४.१.२००४ अन्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत या आकृतीबंधाच्या आढाव्याच्या अधीन राहून ४४९ ग्रामीण / आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना तसेच उक्त पत्रामध्ये आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई यांनी दर्शविलेल्या ८१९४२ अंगणवाडयातील ८१९४२ अंगणवाडी सेविका व ८१९४२ अंगणवाडी मदतनीस व ११६०४ मिनी अंगणवाडी सेविका या मंजूर मानधनी पदांना दि. १.३.२०१० ते ३०.६.२०१० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ हि पदे ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नव्हती या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.**

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४ ऑक्टोबर २००४ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-

( ज. कि. मगरे )
शासनाचे सह सचिव.

सोबत शा.नि. १४.१.२००४ व केंद्र शासनाचे दि. ८.५.२००९ चे पत्र व सहपत्र
प्रति,
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पूणे,
महालेखापाल महाराष्ट्र राज्य १/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद
संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, ठाणे
उप लेखा निरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई ,
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी
वित्त विभाग (का-व्यय-१४ / अर्थसंकल्प-१९ / वित्तीय सुधारणा -१), मंत्रालय, मुंबई.
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभाग (का-४) आणि (का-६), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का-७.